# अंतर्घट

© श्रद्धा पाटील-व्यास
ग्रीन वुडस्, बी-५०३, एम. व्ही. रोड ,
चकाला, अंधेरी पूर्व, मुंबई -९३
**shraddhavyas8@yahoo.com**

● प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान,
11th Floor,
Eternity - G1102,
Eastern Express Highway
Thane : 400 604
Phone: +91 986 967 4820
**website: www.esahity.com**
**e-mail: esahity@gmail.com**

● मुखपृष्ठ व आतील चित्रे :
प्रियाल मोटे, क्लाउड्स स्टुडियो,
Phone: +91 8888 747 731

● प्रथमावृत्ती :
गुढी पाड्वा, चैत्र शुद्ध प्रतिपदा, शके१९३८

०८/०४/२०१६

*प्राणसखी प्रिय आईस...*

*'थोडेसे द्वैत राहू दे अंतर्घटात,*
*सांडू दे अमृत*
*वाहू दे भक्तिरसात...'*



# घट भरून वाहताना

दर वेळी एखादी नवीन कविता लिहिली की वाटतं,झालं आता बहुतेक ही शेवटची,आणखी काही सुचणार नाही यापुढे. पुढे मात्र गंमत होते,पुन्हा शब्द फेर धरतात,मनामध्ये रुंजी घालू लागतात आणि कविता उमटत जाते.'***कापूर***'प्रकाशित झालं आणि जेवढ्या वाचकांपर्यंत पोहोचलं, त्यांना ते अतिशय आवडलं. गुरुसखा प्रकाशनाच्या नावानं ते प्रकाशित झालं पण पुढे मार्केटिंग करणं मात्र झालं नाही. तेव्हांच ई साहित्य प्रकाशन ह्यांच्याशी ओळख झाली आणि त्यांनी '***कापूर***'प्रकाशित करून अनेक वाचकांपर्यंत पोहोचवलं.

'***कापूर***'हे अबोध मनाचा टक्के टोणपे खात झालेला प्रवास आहे. माझ्या मनाचा मलाच विस्मित करणारा अविष्कार आहे. '***नवल***' या कवितेत नशीब हरवलेली मुलगी शेवटी मीच '***जगदंबा***'असं म्हणते हेच तिच्यातलं परिवर्तन आहे. अनेक जणींनी '***कापूर***' वाचून मला लेखी प्रतिक्रिया दिल्या. आदरणीय लताताई भिशीकर यांनी इमेलच्या युगात सुंदर पत्र पाठवलं. सगळ्यांनाच कविता आवडल्या पण दु:ख विसरून त्या सकारात्मक व्हाव्या असा प्रेमळ आशीर्वादही होता. त्या सर्व प्रतिक्रिया '***अंतर्घट***' यात समाविष्ट केल्या आहेत.

'***अंतर्घट***' वेगळ्याच तऱ्हेनं घडलाय.

घट भरलाय आणि त्याचवेळी तो रिकामा देखील आहे. माझंच मला नवल वाटण्या पलीकडे गेलेय मी ह्या प्रवासात. वर्ष २०१३ मध्ये केवळ '***विठ्ठला***' '***तपस्विनी***' आणि '***अंतर्दीप***' या कविता उमटल्या. एक कारण असं की ते वर्ष स्वामी विवेकानंदाचं सार्धशतीचं असल्यामुळे सतत मी स्वामीजींच्या सहवासातच असायची. दुसरा विचार मनात उमटायचा नाही. पण २०१४ साली आणि पुढे खूप काही पुन्हा मनात उमटू लागलं आणि वृंदावनला जायचं नुसतं ठरल्यावर खूप काही घडू लागलं. बांकेबिहारीचं पिसं लागलं आणि राधाराणीनं वेड लावलं. जे काही शब्दात उमटत होतं ते आवरणंच नव्हे तर उमगणं देखील माझ्या अवाक्यात नव्हतं आणि नाही.

मीच होऊ लागले यमुना आणि माझ्या ठायीच मागून घेतला मी राधाराणीचा निवास. बाहेर कुठे त्याला शोधू लागले की शेवटी तो कन्हाई माझ्यातच सापडू लागला. कविता हिंदी असो वा मराठी पण भाव तोच,प्रकटीकरण वेगळं पण आशय तोच. मग शब्द उमटू लागले, '***तन से परे मन के भी पार था ईश्वर का बसर,अब कहीं पता चला मेरे ही भीतर उसका घर...***'

भाषा कोणतीही असो '***तो***' माझ्या अस्तित्वाचाच एक भाग आहे हे लक्षात येऊ लागलं आणि '***तुझ्या असण्याच्या खुणा दिसती सर्व जागी,माझे असणेच तुझे असणे ही जाण उमजली***' हे शब्द सहजपणे आकारू लागले. कुठल्या भाषेत लिहायचं हे देखील सहजच स्फुरतं, न ठरवता, न विचार करता आपोआपच शब्द त्या त्या भाषेत उमटत जातात, त्याच्यावर माझं काहीच नियंत्रण नसतं. द्वैत अद्वैताचा प्रवास अंतर्घट कवितेपासून सुरू झाला आणि तो भाव पुढे कायम राहिला.

'***थोडेसे द्वैत राहू दे अंतर्घटात,सांडू दे अमृत वाहू दे भक्तिरसात..***' असं म्हणताना, मला जाणीव असते की, '***जाहले जनी तुझी कधी मुक्ताई, कधी मीरा मी कधी कान्होपात्रा, कधी झाले तव कंठीची वैजयंती***', आणि विठूच्या मुखदर्शनासाठी तहानलेली मीच असते चंद्रभागा!'

पुढे तर मला जपाची आणि माळेची ही गरज राहिली नाही आणि शब्द झरू लागले, '***हुए दरस तेरे बिन फेरे माला या किये जाप...!***' किंवा '***गळली माळ सरला जप तुझे राहो नाम मुखी..!***'

'***मैं नदिया***' मधल्या काही ओळी मला पुन: पुन्हा प्रचंड मोहात पाडतात, '***बहती मेरी धारा में नमन, नमाज़ ओ नाले मिले, सभीको अपनाया पर स्वअस्तित्व मिटने न दूँगी...!***' '***कृष्णसखा***' भेटला आणि नंतर कधी मी त्याची '***कृष्णसखी***' झाले कळलच नाही.

शब्दांचं मला प्रचंड आकर्षण आहे. ते मला बेला प्रमाणे वाटतात. एक एक शब्द म्हणजे जणू माझं त्या साकाराचं पूजन असतं, त्या अज्ञात शक्तीवर केलेला अभिषेक असतो. एकही लिहिलेला शब्द जर काही कारणास्तव नाकारायला लागला तर जणू हृदयात जखम होते. ही शब्दांची शब्दांनी केलेली पूजा तुमच्यापर्यंत पोहोचल्याची पावती नक्की द्या असे आर्जव आहे. मा सारदादेवी म्हणत की श्री रामकृष्णांच्या सहवासात आनंदाचा एक घडा अखंडपणे जणू त्यांच्या हृदयात भरून ठेवला आहे असा त्यांना अनुभव येत असे. तसंच काहीसं झालं आहे. माझा '***अंतर्घट***' देखील भरून वाहतोय...

०८.०४.२०१६

निरंतर ऋणात..

आभार मानणे हा औपचारिकपणा वाटतो मला, त्यापेक्षा निरंतर ऋणात राहणं जास्त सोयीचं आहे. ‘ई साहित्य प्रकाशन’चे श्री. सुनील सामंत यांनी माझ्या कवितांना तिन्ही भाषांसहित स्वीकारलं ही सारी शब्दांची किमया आणि सरस्वतीचा आशीर्वाद आहे. ‘क्लाउड्स स्टुडियो’च्या सर्वच कलंदर कलाकारांचा यात मोठा वाटा आहे. रोहित कोकिळ मुळेच प्रियाल मोटेची गाठ पडली आणि त्याच्या चित्रांनी ‘अंतर्घट’ अंतर्बाह्य सजला. कवितेचा गाभा समजून चित्र काढलं की किती आतपर्यंत भिडतं हे या दोघांनी ‘कापूर’ व ‘अंतर्घट’ यातून जणू सिद्ध केलय.

माझं पुस्तक एका व्यक्ती वाचून पूर्णच होऊ शकत नाही आणि ते म्हणजे ‘पुणे सकाळ’चे मुख्य उपसंपादक श्री. सुरेंद्र पाटसकर. युनिकोड मधील कविता श्रीलिपीत रुपांतरीत करणे, प्रूफ तपासणे आणि छपाई यात त्याची मोलाची मदत असते.

आई, राहुल आणि सानिका हे कुटुंबाचे तीन कोन खूपच महत्त्वाचे जिथून सतत मला उर्जा मिळत राहते. शिवाय जयश्री मांडके ही माझ्या लिखित साहित्याची अलिखित भागीदार आहे.

सगळ्यात शेवटी त्याची मी अत्यंत ऋणी आहे जो अनेक वेळा कवितांचा विषय झाला. वृंदावनला जाण्यापूर्वीच जो कवितेतून डोकावू लागला, तोच कान्हा अगणित रूपांनी प्रत्येक कवितेत प्रकट होत गेला. कधी विठू तर कधी शिव, कधी मन तर कधी पाऊस, कधी राधा तर कधी यमुना, कधी अजनबी तर कधी परदेसी, पण तो कुठल्याही रुपात आला तरी माझा आत्मसखा ओळखू आला मला. अद्वैताची अनुभूती दिली त्याने मला पण त्याच्या चरणाशी एवढीच प्रार्थना की, ‘थोडेसे द्वैत राहू दे अंतर्घटात... ’



श्रद्धाजी,

आज पहाटे चार वाजता उठून तुमच्या कविता वाचायला घेतल्या. पुस्तक वाचताना पहिलं जे मनात आलं ते हे की या कविता मनाच्या उद्विग्न अवस्थेत वाचायला घ्याव्यात. वादळं शमतील. अतिशय ‘सुकून’ देणारे शब्द, आश्वस्त करणारे भाव, शांतवणाऱ्या कविता, मनाला जोजवणारे विषय. वारंवार येणारे स्वामीजींचे, बेलूर आणि दक्षिणेश्वराचे संदर्भ मनाला एका दिगंताचा अनुभव देतात. एक शुभप्रवासच घडतो, जणू तीर्थयात्रा!

‘दुःख सरले, मरणही हरले, हरला मी तू पणाचा ध्यास,’ अशी अवस्था होते. दुःखाचा ‘बेजुबान ताज’ बनतो. एक आगळी प्रसन्नता येते. ओढून ताणून खुशीचा चेहरा आणावा लागत नाही. ‘बिना बारिश’ मनातला मयुरपंख डोलू लागतो. तुमच्या शब्दांतून निर्माण होणाऱ्या प्रतिमांमध्ये ती जादू आहे. (मात्र काही शब्दांचा अर्थच माहित नसल्यामुळे अडायलाही झालं. कारण तुमचा अनुभवाचा आवाका प्रचंड आहे. उदा. काली कमलीवाले )

काही काही ओळींनी तर मनावर गारुड घातलं.

*उड जाये प्राणपंखेरू तो टहनी टूट जायेगी.*
किंवा
*करता पंढरीची वारी*
*दीन दिसो लागे लंका*
असा मनोभाव प्रसन्न होऊन जातो.
*तुम हो भी और नहीं भी*
अशी पहेली गुंग करून टाकते.
आणि त्याच्या चरणी लीन झालेलं मन
*मन मुक्त, मन डोह,* असं मुक्त पक्षी होऊन जातं.
तुमच्या कवितांवर स्वामीजींचे विचार आणि रवींद्रबाबूंची भावुकता यांच्या मिलापाचे सुंदर छत्र आहे. त्यात फिकट ‘मनभावन’ रंग आहेत. त्यामुळे तुमच्या अंतरात पैंजणांचा नाद अखंड सुरू असतो. ‘शब्देविण संवादु’ आपल्या कवितेत ठायी ठायी आहे. अबोल संवादातली निःशब्द धून आपण अनुभवत असता. आपल्या कवितांतून वाचकही ती अनुभवतो.
‘देह बसे जागी खिळून, मन चहूदिशांना पिसाटलं’ अशी विक्षिप्त अनुभूती येण्यासाठी असणारं एक कवीमन, स्वामीजींचे संस्कार आणि प्रचंड वाचनातून आलेले अचाट शब्दभंडार यांच्या संगमातून जन्माला आलेला हा कवितासंग्रह एका बैठकीत वाचून संपला. हे काही योग्य नाही. कवितासंग्रह एका वेळी एक कविता असा घोटाघोटाने चवीचवीने अनुभवायचा असतो. निदान मी तरी तसे मानतो. पण हा कवितासंग्रह मात्र त्याला अपवाद झाला. संपूर्ण सकाळ एखाद्या प्रभातरागासारखी आनंदात गेली.
धन्यवाद, एका सुंदर कवितासंग्रहासाठी.
प्रियालची चित्रं तर अप्रतिम. एकदा हे पुस्तक न वाचता फक्त चित्रांच्या अल्बमसारखं बघत रहावं. अतिशय कमी, साध्या रेषांतून अचाट भावना रेखाटण्याचं त्याचं कौशल्य कवीपेक्षा कमी नाही.

शुभं भवतु !

सुनील सामंत
(अध्यक्ष, ई साहित्य प्रतिष्ठान)

# अनुक्रमाणिका





# विठ्ठला

मृदू मऊ स्पर्श तुझा
असे लोण्याहुनि मऊ
डोकं टेकता पायांवरी
वाटले येथेचि राहू

सर्व दूर तुझाच नाद
चोहीकडे तुझाच डंका
करता पंढरीची वारी
दीन दिसो लागे लंका

होईल कृपा तेव्हा येऊ पायी
तू भूक तू तहान तूच साऊली
तप्त देह मन नयन गे माझे
दर्शने होईन तृप्त विठूमाऊली

*०७.०६.२०१३*

# अंतर्दीप

अपनों के बीच भी अजनबी सी
अपने कहाँ अनजान हैं सभी

घर की दीवारें खड़ी चुप सुनीसी
न देखें न सुनें ऐसे अन्जान कभी

अन्दर हूँ क्यूँ डरी डरी टूटी सी
आखरी डोर भी टूट रहा है अभी

सहम कर बैठी हूँ कमरे में ऐसी
दूर झुटे रिश्तोंसे जहां लोग हैं दंभी

सुख की लौ दिखे दूर स्वप्नसी
अंतर्दीप जलाने चल पड़ी मैं भी

*१८.०९.२०१३ / रविवार*

# हे साग़र

सफ़र वही मेरा रास्ता वही है
पर तेरा रूप बदलता रहता है
कभी गहरा तो कभी सुनहरा
तू और भी लुभाता रहता है

देखूँ तुझे पल पल हर साँझ सवेरे
तेरा विराट अस्तित्व क्षितिज तक
लगालूँ माथे तो कभी चूमूँ कदम
दिन के निकलते चाँद ढलने तक

बारिश में तो तुम बनते यूँ बेकाबू
जैसे चंचल बालक या प्रेमी पागल
अपने रूप को पहचान ही जाते हो
के मैं ही सागर और मैं ही बादल !!

मेरे कार्यालय के रास्ते पर उसे रोज देखती हूँ
और फिर ये शब्द उतरते गए .....

*३.७.२०१४*

# संन्यासिनी

जब लौटे रथ में कान्हा बलभद्र सुभद्रा
उस दिन हुआ एक तपस्विनी का उदय
स्त्री कौम के उज्ज्वल जीवन के लिए ही
आपका इस दुनिया में आना था तय

शुरू से अंत तक इतनी शुद्ध ओ निर्मल
कभी कभार ही होती पवित्रता निर्माण
स्वामीजी का स्वप्न श्री श्रीमा का कार्य,
ठाकुरकृपा का बोलो कौन नापे परिमाण

बनी पारुल कभी सरला कभी श्रीभारती
की घोर तपस्या हुए प्रसन्न काशीराणा
जीवन भर रही करती श्रीमाँ की आरती
और माँ की बेटी बन बैठी भारतीप्राणा

*For Rev. Bharatiprana Mataji, who was the 1st President of Sri Sarada Math, Dakshineshwar, Kolkata.*
*०८.०७.२०१३ / १४:३०*



# बेलूर से दक्षिणेश्वर नाँव में

हर बात शब्दों में बाँधी नहीं जाती
बारिश की खुशबु कागज़ की कश्ती
मौसम के नज़ारे नजरों से मैं पीलूँ
बोलो तो मुझे कैसे बोलों में ढालती

जबा के अनदेखे रंग भरभर नयन
सबा ए खुशबूसे भरा तन भरा मन
कौन कलमसे उतारूँ मैं ये तस्वीर
कैसे लिखूं बारिश की घन घननन्

संन्यासी वस्त्रों के ज्वाला जैसे रंग
संगों से निःसंग उनके ह्रदय अभंग
गंगाकी मौजोंका उछाल जो भिगोये
भला किन लफ्जोंमें मैं बाँधू ये तरंग

बेलूर से दक्षिणेश्वर नाव का सफर
दरस की आस लिए एकटक नजर
तन मन शुद्ध चित्त जपे शिवोऽहम्
सब शब्द हुए मौन देखके वो मंजर

*२४.०७.१४*

# O Mother Brahmaputra

When I crossed you at different places,
On your lap hugging like a child to your bosom
Wondering about your vastness, the expanse
I could only look up and smile with content
Days and years passed and the love grew,
Awe turned into respect at your ferocious beauty
Like Ma Kali you grasp everything into you -
And then gently feed your children of nectar
They once said to me that you lived in my eyes,
Ever flowing, incessant, uncontrolled on the brim
I rubbed aside their accusations laughing aloud
Trying to hide you from their eyes their gaze
Lest they pollute You and take away from me
I thought they had succeeded in their attempts
Living for years with dry eyes and empty gaze
But, O mother Ganga, just your one glimpse
After the years of emptiness away from you
You come again and flow through me in floods,
Be with me Mother so that I feel your presence
I pray, may my heart never be dried out of You!

*13.03.2015 / 17:30*



# The Beasts

Don't you know when they come
They come in a guise of humans
Attacking from all directions;
Hiding in the social garb of decent
Wearing the labels of culture clan

They never speak nor use the knife
Always use their flesh loving jaws
Piercing deep into the body?
Nay, nay, eating into the souls
Letting the innocence suffer,

Making lives miserable to rot,
Misery grips and the girls gropel
Silence of grief covers the future
Surrounded by questioning eyes,
But she has to drink the poison
Quietly silently with the salty water!!

*13.03.2015 / 6.30 in train*

# अग्नी पर्व

तुला अग्नी दिल्या क्षणी माझं शरीर भाजून निघालं
पेटत्या ज्वाळा चोहि दिशी मन सीतेसम विझून गेलं

त्या धगीत दिली काळ्या मण्यांची माळ भिरकावून
आले होते ओढण्या चहु बाजूंनी अनेक हात सरसावून

तप सरलं धगधगत्या उन्हात तनमन पोळून काढत
पण आलं नाही कोणीच कधी मायेची सावली धरत

कसलं नातं अन् कसलं गोत कोणीच नसतं आपलं होत
मायापाशा पेक्षाही अधिक तुझ्या कृपेचा अव्याहत स्रोत

*२२. ०३.२०१५ / १४:४५*

# कृष्ण सखा



तुझं माझं सख्य सख्या आहे जगाआगळं
ना राधेचं ना मीरेचं पण त्याहूनही वेगळं

सर्वांना असे ठाऊक फक्त गोपीं सवे रास
पाऊलवाटा जाणती केवळ राधिकेची आस

पौर्णिमेच्या रात्री रंगे कृष्णा संगे लीला
आणी कुणी न जाणी मन माझे मदनगोपाला

तो चित्तचोरटा खेळे खेळ जमवूनी सवंगडी
हरविता चेंडू मारी मग माझ्या वक्षी उडी

कालिया मर्दन होते जणू केवळ एक बहाणा
व्हावा चित्ती स्पर्श तुझा ही इच्छा मनमोहना

नाही कळली प्रीत कोणा तू होतास नित्य तटी
उद्धवासही नाही कळले काही मी पडले पायवटी

मी काळी तू निळा ह्या निळ्या सांजवेळा
मी यमुना मी सखी मज मिठीत घे सावळ्या



*१५.०३.२०१५ / ६:००*



# राधाराणीचा निवास

तुझी ओढ नाही नाही रे गोपाला लागली राधेची आस,
प्रेम भक्ती असते कशी मला ती ओळख होईल खास!

तुझी लीला तुझी मुरली असे सर्वदूर तुझाच आभास,
तुझे प्रेम तुझे मोरपीस मंतरले गोप गायी आसपास

रात्र जागी गोपी जाग्या पसरले तुझे जादूभरले पाश,
शांत झोपले वृंदावन तरीही जागे आसमंत अवकाश

रे केलीस कसली किमया कान्हा भय सरले सावकाश,
लज्जा त्यजली सूरात भिजली वसे हृदयी पूर्ण प्रकाश

तिची विरक्ती तिची शक्ती तिचा तुझ्या ठायी प्रवास
माझे मन माझी भक्ती तिच्या सम तूच माझा श्वास

दु:ख सरले मरणही हरले हरला मी तू पणाचा ध्यास
हे कृष्ण सख्या राहो अंतरी आता राधाराणीचा निवास

*२१.०३.२०१५ / १५.४०*



# ताज

आज फिरसे क्यूँ उसी दौर का आगाज है
तनहाई में लिपटी खामोशी की आवाज है

दिल को मरोडे जब रुह जिस्म से हो अलग
यह कैसा अनसुना बीतीं यादों का साज है

खिलखिलाती हँसी के बीच सन्नाटे का खौफ
खुशियाँ आखिर क्यूँ मायुसी की मोहताज है

मेरी खुली आँखों से जब टपकता है आंसू
कर दूँ सब बयाँ या रखूँ छिपाकर जो राज है

रब ने दिए दामन भर भर के गम बेहिसाब
आओ दुखों तुम्हींसे बना ये बेजुबाँ ताज है

*२५.०३.२०१५/ २०.४५*

# फिरसे कोयल

कोयल फिरसे कुहुक रही है
अपना अंतर्मन खोल रही है
मत आना ऐ मुसाफिरों यहाँ
अब वह राह बदल रही है

झड़ गये पकते पकते आम
मौसम ने किया सब तमाम
किसान टूटे जब खेत ही रूठे
वो तो गाती रहे बिना विराम

पेड़ों में छिपकर कुछ न होगा
सामने तो तुझे आनाही होगा
टूटे रूठे थके हातों को थामें
मीठे बोलोंसे रिझाना ही होगा

तेरी कुहू से खुश होती दुनिया
खिडकी के बाहर झांके मुनिया
दिखे न दिखे तू खिलते जीवन
तेरी मस्ती से मुस्काती बगिया

*०६.०५.२०१५ / १४.३०*





# अंतर्घट

अंतर्घट भरा फिर भी लागे ये खाली क्यूँ
सूनेसे दिल में फिर फिर के उदासी क्यूं

करवट बदलती जाती है बार बार जिंदगी
बिना झपके पलकों में आते हैं सपने क्यूँ

तय हो चुके जब जी लेने के बहाने फिर
खाली हातों में रेत के रूखे से किनारे क्यूँ

हँसना है मुस्कुराना है हजार बार समझाया
हँसते हँसते टिपटिप बहते हैं फिर आंसू क्यूँ

धो लिया मैल बदल दी चादर तेरे दरबार में
तो दुबारा से ओढ़ाते हो ये काली चुनर क्यूँ

मैंने ख़ुशी का चेहरा ओढ़ लिया है हे भगवन,
अब नकाब के पीछे भी दुखों की दस्तक क्यूँ

*०६.०४.२०१५ / १२:४०*

# अजनबी

तिनके चुन चुनके बंद किये दरवाजे
अजनबी दहलीज पर दस्तक ना दो

दरारों में चिपकायी यादों की माटी
मन के किवाड भितर थाल न बाटी
अब इन्हें खोलने की कसमें ना दो
अजनबी  दहलीज पर...

खोखली है दिवारें सारी टुटें है तार
मुश्किल से बडी बंद किया है द्वार
तेरी आहट भी ईंटो को सुनने ना दो
अजनबी  दहलीज पर...

अन्जान हमलों से छलनी हुआ सीना
ना बचपन में सुकून रोते बीती रैना
आँसू पीनेके यूँ झूठेमुठे बहाने ना दो
अजनबी  दहलीज पर...

न तेरी जफा का डर न वफा की चाह
न प्यार की उम्मीद न चाहूँ तेरी बाँह
मिले उम्र बाद अब मुझे खोने ना दो
अजनबी  दहलीज पर दस्तक ना दो



*१५.०४.९५ / १३.९५*

# तपस्या

ऐसे लग रहा है के बस बैठूँ चुपचाप
न सुनूँ न बोलूँ भूलूँ सारे संसार ताप

रिश्ता जुड़ा जब आत्मा का आत्मा से
अब काहे का पुण्य और काहे का पाप

मुश्किल था देखना तेरा रूप हर किसी में
पता चला अब तेरा न कोई नाम ना नाप

सफल हुई तपस्या मेरी बिना जाने वेदांत
हुए दरस तेरे बिन फेरे माला या किये जाप ..!

*१५.०४.२०१५ / १६.१६*



# भरी झोली

मैं कुछ कहूँ ना कहूँ मेरी खामोशी बोलेगी,
खिलेंगे तारे सभी और रातरानी मुस्कायेगी।

मेरे शब्दों से आगे है रूहे एहसास की खुशबू,
फेरों की क्या जरूरत जब कायनात ब्याहेगी।

रहेगी हसरत हमेशा तेरे दीद की निगाहों को,
छूपो चाहे अंबर में पर चाँदनी राह दिखाएगी।

बरसों तुमने चाहा मुझको अब बारी मेरी है,
छुटे चाहे दामन तेरा मेरी झोली भर जाएगी।

रूहों का रिश्ता यह ईश्वर की ही सौगात है,
उड जाऐ प्राण पखेरू तो टहनी टूट जाएगी।

*१८.०४.९५ / ४.३०*

# परदेसी

परदेसी आने से पहले जाने का पैगाम दे दिया
मिलने से पहले मुलाकात को अन्जाम दे दिया

कडकी थी बिजली गरजे थे बादल बेरहम से
बरसे ही नहीं और सावन को इल्जाम दे दिया

ना मय ना मयखाना ना मधुशाला है कोई
होश उड गए तब साकी को पैमाना दे दिया

कैसी रंजिश है सिर्फ तेरे होने का एहसास है
हाथों से छुए बिना प्यासे को जाम दे दिया

कलम की सियाही से लिखूँ तेरा नाम जुबाँ पर
नजरोंने तू है तू है का बुलावा सरेआम दे दिया

*शुक्रवार / २४.०४.२०१५ / १२:१८*

# गर्भ मंदीर

मोकळ्या गर्भ मंदीरात शांत ज्योत उजळली
रंग रूप गंध विहीन फुले तव सुवासाने बहरली

नाही मूर्ती नसे पणती मग असे काय जाहले
देव देवता नाहीत तरी हृदयी पाऊले उमटली

तुझ्या असण्याच्या खुणा दिसती सर्व जागी
माझे असणेच तुझे असणे ही जाण उमजली

जरी होते आजवरी अदृश्य पाश मज ओढणारे
कान्हा तुझ्या मुरलीने सारी ओळख जागवली

कशी राहू ह्या तीरावर येता पाव्याचे सूर मधुर
तुज भेटीस निघता सखया यमुनाजळे ओसरली

शरदाची रात्र राया तुजसवे रास खेळल्या गोपी
राधाराणी रमली संगे सारी सृष्टी ही नादावली

*सोमवार / २७.०४.२०१५ / १५:४५*



# हे नरेन्द्रनाथ

सूर्यसम दिव्य तेज आँखों में हे नरेन्द्रनाथ तेरे
हटा अंध:कार राह का जबसे आये तुम प्रभु मेरे

सब हो चूका है नष्ट ध्वस्त था यही एक भ्रम
थामा जब हाथ तेरा तब चूर हुए सभी सम्भ्रम

कुछ था ही नहीं और ना कुछ है अब मेरे पास
पर मिला साथ ऐसा के अब कुछ न आये रास

तेरी स्तुती तेरेही गान गाऊँ जबतक रहें ये प्राण
आजीवन बोलूँ तेरा जीवन तब तक ही रहे त्राण

स्वामीजी न लगे कुछ भी अच्छा अब तुम्हरे सिवा
हो तुमही गुरू तुम्ही सखा बंधू तुम तुम्ही हो शिवा

तेरा बचपन तेरा भ्रमण तेरा इस भूमी पर अवतरण
तेरी शिक्षा का रहे असर सब जनजीवन पर आमरण

तुझसे सीखा है निर्भयता और हरदम डँटकर रहना
नित्य सत्य वर्तन करें करें हम बल की ही उपासना

मीराबाई जैसे हमें भी चाकर रखलो प्रभु बिना मोल
चलें उसी पदपथ पर जहाँ पड़े चरण तुम्हारे अनमोल

*३०.०८.२०१५ / १६:१५*

# मेरे जीवन

मेरे जीवन मायूस ना होना
तो क्या हुआ गर कोयल चुप हुई
तो क्या मुझसे बात छूट गयी
ऐसे तो कईं साल निकल गए
रेतों जैसे सारे सपने फिसल गए
तेरे मेरे दरमियाँ कईं फासले रहे
अब फासलों की दिवार टूट गयी
पर तू मुझे अब आवाज न देना
मेरे कटे तारों को दुबारा न जोड़
फिरसे जीने की उम्मीद न जगा
सपनों से यूँ दामन न सजा
जो पुरे न हों ऐसे एहसास न दे
जिंदगी को कोई नया मोड़ न दे
चुप है कोयल तो चुपही रहने दे
न पेड़ न घोंसला न अपना कोई
उसे दर्द के बोलों से पुकारने दे
उसे बस डाली पर कुहुकने दे
उसे बस डाली पर कुहुकने दे!

*सोमवार / २७ . ०४ . २०१५ / १६:१५*

# नेपाल के लिए

अरसा हुआ बहुत पर आज मेरी आँखोंसे सागर बहा
जाने क्या है गम कैसे समझाऊँ क्या क्या चुभ रहा

बाँधा था बड़े शौकसे मकान हमने तिनका धागा ढोकर
ऐसी खसकी जमीन पाँव तले आशियाना रेत सा ढहा

चढ़ायी थी मंज़िल पे मंज़िल बड़े अरमानों से सिंचकर
खुदा तेरी खुदगर्ज़ी की चोटसे सिर्फ मिटटी का ढ़ेर बहा

टूटे बर्तन छूटे रिश्ते हर तरफ़ मौत का सन्नाटा छाया
कैसी डोली काहेकी बारात अब तो निकला जनाज़ा यहाँ

कदमों के नीचे आया छत ना घर ना यार ना परिवार रहा
न जाने धरा के काँपने से किसने क्या खोया क्या क्या सहा....

*०३.०५.२०१५ / २३:०५*

# अन्जान शहर

अकेले रहने की आदत डाल ली है हमने
यादों में आकर दुबारा तू हलचल न मचा
कांटों से ही सही पर भर चुका है दामन
नकली फूलोंके रहम की मलमल न बिछा

अंधेरों से छँटकर अब कहीं हुए थे रोशन
क्यूँ फिर ले चले जहाँ काला बादल है बसा
ठानली थी मंज़िल अन्जान शहर में मकान
हमसाथी हमराज़ बनके क़दमों को न फँसा

तू खुश है रह खुश तू सँभाल तेरा आशियाना
बंजर मेरी जमीं खेत खलियान न पौधा हँसा
जो ना मुकम्मल हो ऐसे सपनों का फ़साना,
देखा ना सूना कहीं बिना जल के चंदन घिसा

*०४.०५.२०१५ / १४.४०*

# मयूर पंख

झूम रहा है मन मेरा खुशीयों के हिंडोले पर
मानो अंबर झुका हो निचे और मैं उसके ऊपर

मिल गया आज मुझे जो खोया था बचपन में
एक अन्जानीसी खोज आके रुक गयी रूह पर

सँभाल के रखा था मयूर का पंख किताब में
बिना बारिश के ही नाच उठा है खोल के पर

धुंधलिसी छब छिपी थी दिलके किसी कोने में
बरसों बाद छिड़ा तार निखरी छब आयी उभर

अनकहा अनसुना अपने अस्तित्व से बेखबर
न थी सिर्फ लहर बसा था पूरा बेसबर समंदर

तन से परे मन के भी पार था ईश्वर का बसर
अब कहीं पता चला मेरे ही भीतर उसका घर

*०७.०५.२०१५*



# अग्निपरीक्षा

चाहा था एक लफ्ज़ तिनके के सहारे जैसा
डूब जाऐं जब समंदर में तो लागे रब जैसा

आप ने तो खड़ा कर दिया धुप की आग में
अब पता चला यह भी है अग्निपरीक्षा जैसा

माँगा था गुलमोहर मिला आज पलाश साथ
माथे सूर्य धरती तपी ह्रदय जले ज्वाला जैसा

जानते थे हम फिर भी पूछ बैठे याचक बनकर
मानो किया गुनाह कोई पूछा हो खजाना जैसा

तुमने दिया है भरभर के इतने सालों का प्यार
जलाएँगे खुदको हरदम जले कोई चिराग जैसा

भूल बैठे थे सात वचन अपने रिश्ते के हम
ऐसी दी सजा के फिर हुआ घर विरान जैसा

*०८. ०५. २०१५ / १४.३५*



# आई माझी

आई म्हणजे प्राणसखी
आई म्हणजे साखरमिठी

आई असते चिर मैत्रीण
घट्ट घट्ट हृदयाची विण

आई अंतरीची मधुर माया
गेले कुठे तरी धरील छाया

आई ईश्वराचं मूर्त अस्तित्व
जगदंबे तुझं अमूर्त स्वामित्व

आई मधुरतेची अविट गोडी
मजसाठी सुखसर्वस्व सोडी

आई सुखाचा सागर अपार
आई थंडीतली सुंदर दुपार

आई तू श्वास आई आहे खास
तुझ्याठायी आहे श्रध्देचा वास..

*१०.०५.२०१५ / ७.४०*

# अधूरी कहानी

सुनो ऐसी है कश्मकश कहानी पूरी कहें या अधूरी
इसमें राजा भी है और रानी भी पर है बहूतही दूरी

इधर उधर जाने किधर ढूंढा दिल ने हर इक तरफ
वन आंगन खोजा बहुत तो भीतर ही मिली कस्तूरी

बन बैठी थी सूखे पौधे की तरह बेजान ओ बेरंगसी
छुआ जो तुमने आत्मा को खिलकर बनी मैं हरीभरी

अकेले तनहा गुजर रहे थे दिन सबके बीचोंबीच में
दूर होकर भी पाती हूँ तेरी अनदेखी बाहों में घिरी

बादलों से भरा था चमन काले काले माँ काली जैसा
तुम सूरज बने हर मेघ किनार बनी घनी रुप रुपहरी

हे भगवन मुझपर इतनी कृपा बनी रहे जीवन भर
हर सुबह शाम हो तुझसे शुरू तुझपे ही रुके श्रीहरि

*१४.०५.१५ - १६:०५*

# मैं नदिया

भरी है काली गागर फिर भी छलकने न दूँगी
बड़े कीमती मोती छिपें हैं यूँ किसे छूने न दूँगी

खुशियों से बह रही टोकरी बटोरूँ या बाँटु इन्हें
जितना चाहे लुटाऊँ पर इसे खाली होने न दूँगी

उगम से अंत तक ना था कोई किनारा हासिल
मिली हूँ सागर से अब जरा भी दूरी रहने न दूँगी

बहती मेरी धारा में नमन, नमाज़ ओ नाले मिले
सभीको अपनाया पर स्वअस्तित्व मिटने न दूँगी

गंगा हूँ यमुना भी हूँ मैं शिवजी माथे बिराजूँ मैं ही
पिलाऊँगी अमृत केवल जहर की बूँदे पीने ना दूँगी

धोलो पाँव चाहे लगाओ सिरपर और करलो शुद्धि
शुद्ध पवित्र आत्मा मेरी कतई मैली करने न दूँगी

*२२.०५.२०१५ / १७:००*



# तव पदस्पर्शे

तुजसाठी जगणे आता तुजसाठीच मरणेही
तवस्पर्शाने फुलले जीवन सर्वांचे फुलवेनही

असो नसो सहवास तरी तूची रे सहप्रवासी
तुजसाथीने चालेन तुझ्या विना धडपडेनही

होई श्वासा सवे नामजप नसेनाका माळ रे
सोहंम मुखे म्हणता देवा झाले मी शिवोहंही

राहो कटीवरी हात अथवा धरीसी तू बासरी
तूची विठू तूच राया तूच आहेस रामकृष्णही

दिलीस स्फूर्ती तुझे गुणगान करण्यासाठी रे
नव्हते आपले म्हणण्या जोगे जेव्हा काहीही

शिळा होऊनी पडलेले जन्म जन्म सरले तरी
पदस्पर्शे तव मुक्त जाहले मी अहिल्ये परीही

*२५.०५.१५ / १५:५०*



# छुईमुई

कोयल चुपचाप क्यूँ सहम गयी है
सिकुड़ कर टहनी में छिप गयी है
किसने तोडा तेरा छुईमुई सा दिल
अपनेसे ही क्यूँ मुख छुपा रही है
चली जा घने जंगलों के बीच में
छूप जा किसी टहनी या डाली में
छिपा लेना अपनी काली काया
न डाले तुझपर कोई अपनी माया
मोह के चपेटे में हरगिज़ न आना
बातों के किसी जाल में न फँसना

तुझे कभीभी न कोई समझ पाया
तेरे बोलों को सराहा, दूरसे सँवारा
तुझे छूना पर था उन्हें न गँवारा
कितना अच्छा गाती हो सुनाओ
जितना हो सके दूरसे ही रिझाओ
पर कोयल तुम बुरा न मानना
अपना चैन खोये पर उन्हें मनाना
जितना भी हो गहरा छेद मकान में
तुम अपनेही गीत गुनगुनाते रहना

*०१.०६.२०१५ / १५.४५*

# इबादत

अकेलापन बोझसा बना है परमात्मन
अचानकही अंधेरे में डूब जाता है मन
फिर कहींसे उठकर आता है तेरा हाथ
लौट आती हूँ सबके बीच सहलाके तन

है सबकुछ फिर भी है बस तेरीही आस
चाहूँ धरा ना आसमाँ की महफिल खास
हो जाए मेरी इबादत कुबूल तेरे चरणोंमें
बना रहे रहम तेरा रहे सिर्फ तेरी तराश

अनेक सवाल लिए जहन में गुजरा जनम
अनगिनत थे दुख पर न कोसा इक कदम
एक एक करके छिना सबकुछ तुमने पिया
हर इक फैसला लगाया चूमके माथे हरदम

किया इतना प्यार तुझसे न थी कोई खोट
किया पूर्ण समर्पण दी तुने कितनी ही चोट
सारे जनमों की बाकी करदो पूरी इसी बार
करो करम ऐसा फिर कभीभी ना आऊँ लौट

*०३.०६.२०१५ / २०.१८*

# काली कमलीवाले

तेरे मेरे दरमियाँ लगता है कुछ टूट गया
क्यों लागे है जैसे हाथों से हाथ छूट गया

सोतें है अब भी तेरा दामन थामें रातोंको
तेरा ना होना भी ख्वाबों ने झुठला दिया

तेरी बाँहों में ही लिपटता रहे हर पल मेरा
मोहताज नहीं हैं पिया आये या रूठ गया

चले थे भरी गागर छलकाने पर क्या करें
ओ काली कमलीवाले मेरा घडा फूट गया

*२२.०६.९५ / १७:२६*

# बहाणे

माझ्या डोळ्यात बरसे ऊन पाऊस
उगा खरे खोटे बहाणे नको रे देऊस
यमुना वहातेय भरून कशी दुथडी
कान्हा नको न मज सोडून जाऊस

उरात वाहतो पूर आहे हृदयात काहूर
ऐकण्या पावा माझे पैंजण ही आतुर
तुझे पात्र होई रुंद नको वैरीण होऊस
हो सखी तू माझी वनमाळी राही दूर

मुक्त केसात माझा सखा करी शृंगार
लावी पायी अळता नी गळा पुष्पहार
रास रंगे गोपींसंगे पडे देवांनाही मोह
राधा होई कृष्ण अन जाई यमुना पार

*२६.०६.१५ / १४:३०*



# जनमदिन का तोहफा

दामन छुड़ाकर जिस जहाँ में चल दिए
उस दुनिया से लौटना नही है मुमकिन
तुम आना भी मत दुबारा सहने पीड़ा
वरना बहेंगी आँसूकी नदिया नमकीन

जो था सहना तेरे देह को इस जन्म में
भोग चुके तुम पिछले जन्मों की बाकी
लेनदेन लोगोंके और कर्जा कोर्ट कचेहरी
सारा चुकाया मैंने पर अब भी नहीं थकी

लोगों को देखा हमने अधूरी ख्वाइशें लिए
चले गए दुनिया से दर्दमें रोते कराहते हुए
पर तुम हजारों में एक नसीबवाले निकले
ना रंजिश ख्वाबोंकी ना जख्म न दर्द छुए

जाओ आसमाँ पार उस नगरी में बस जा
छैल छबीले कन्हैया की लीला में रंग जा
जो ना मिले आसानी से तपस्या बाद भी
जन्म-कर्म की मुक्ति के रंग में ढल जा

*२५.०६.१५ / १४:४५*

# कोण आहेस तू

कोण आहेस तू सांगू शकतोस का
काळ्या मातीला गंध देणारा पाऊस
की धरेला मिठीत घेणारा समुद्र तू
असीम माझ्या सीमेला कवेत घेऊन
तुझ्यात सामावून घेणारं क्षितीज तू
अकिंचन मला स्पर्शणारा परीस तू
की सतत साद घालणारा वेणुनाद तू
मोहवणाऱ्या मोगऱ्याचा सुगंध आहेस
की नादविणारा मदनबाण आहेस तू
अस्पर्शित देहाला स्पर्शिणारा अग्नी
की तप्त भूमीस शांतवणारा मेघ तू
युगेन् युगे केली परिक्रमा केलं तपही
तरीही विरह अर्पिणारा तेजोगोल तू
मुरलीने धुंद करणारा रासरचैय्या तू
विरह विमुक्त असणारा कन्हैय्या तू
सांगू शकत नाहीस न कोण आहेस तू
मला विचार न, तूच मी अन मीच तू
तूच होतोस गोपी नी तूच आहेस राधा
तुझी होते तुझीच राहीन अशी ही श्रद्धा

*३०.०६.९५ / १४:५०*

# कर रे मुक्त

कुठून येतेय हाक तुझ्या मुरलीचा रे नाद
शोध घेतेय रानी वनी घालतेय तुला साद

सुरात भिजुनी पान्हा फुटुनी धाव घेती धेनु
मयुर नाचती मेघां सवे तूझी रे वाजता वेणू

येता यमुनेस उधाण गिरिराज पाही डोकावून
कधी येशील हरी घेशील करी म्हणे उसासून

तू यशोदेचा कान्हा तूच गोपगोपींचा रे कृष्ण
दिसला नाहीस क्षणभरी तरी अश्रू झरती उष्ण

बरसान्याची राधारानी कैसी धावे वृन्दावनी
पार करी रौरव यमुना पूर्णचंद्र उमलता मनी

थांग लागेना गूढ कळेना ऐसी प्रीत अशरीरी
रिक्त झाल्यावरीच वाजते ही कान्हाची बासरी

नको उसासे नकोत अश्रू नको ही ये जा भूतळी
कर मुक्त ह्याच जन्मी घे ना जवळी वनमाळी

*०१.०७.०८ / १२:१६*



# शरणागती

माझी श्रद्धा अन् माझी भक्ती
वाहिली तुज ठायी रे विठूराया
ठेविता माथा ध्यायिली शक्ती
तुझिया पायी पंढरीच्या राया

जाहले जनी तुझी कधी मुक्ताई
कधी मीरा मी कधी कान्होपात्रा
कधी झाले तव कंठीची वैजयंती
होवो सुगम ह्या जन्मीची यात्रा

कधी होईल गे जिवाशिवाची भेटी
कधी देशी दर्शन मज हे जगजेठी
कितीक केली आजवरी आटाआटी
कधी घेशी मज हृदयकमल दिठी

ठेविले रुखमाईस देव्हाऱ्या बाहेरी
हात ठेऊनी कटी तू विटेवरी उगा
ताटकळत उभी मीही येण्या माहेरी
तव मुखदर्शना तहानली चंद्रभागा!

*११.०७.२०१५ / ११.४६*

# अर्पण

तुझेच तुला अर्पण करायचे आहे
मग माझे म्हणून काय देऊ मी?
देह तुझा मन ही झाले तुझे,
मग उरले काय तुला वहायला
देण्यासारखे राहिले काय विठ्ठला
आत्मा देखील तव स्वरूप झाला,
माझे काही म्हणून नुरले आता
ऐसे अद्वैत घेऊन काय बरे करू
तुझे सगुण रूप भावते विठूराया,
थोडेसे द्वैत राहू दे अंतर्घटात,
सांडू दे अमृत वाहू दे भक्तिरसात
तेवढेच आहे मजपाशी सावळ्या
सारे तुझ्या वाहिल्यावर चरणी,
राहे केवळ भक्ती तुला अर्पिण्या
कळले आकळले काय द्यावे तुवा
एकच एक राहे अकलंकित देण्या
प्रेमभक्ती अंतरीची शुद्ध सात्विक
दुजे काही नाही तुज देण्या पांडुरंगा
ऐसी करीन भक्ती विसरून सारे द्वैत
होईन एकरूप की उरेल फक्त अद्वैत !

*१३.०७.२०१५ / १६:५०*

# पहेली

तुम हो भी और नहीं भी यह कैसी अजीब पहेली है
तुम्हें जानने के जूनून में हर इक राह नई नवेली है

तेरे रूप से हूँ वाकिफ बचपन से आजतक अजनबी
तेरी रूह तक पहुंच सकूँ ऐसी मेरी चाह अलबेली है

न थी खबर न अतापता खुशियों के आशियाने का
पा लिया तुझे तो जैसे पायी मैंने सुखकी हवेली है

मंदीर में ढूँढा मस्जिद में देखा गिरिजाघर  तलाशे
कहीं हो जाए दरस तेरे यह आशा बड़ीही धुंधली है

उम्र कटी साँसे छूटी पर तेरी कृपा बरसी है मुझपर
तेरे सिवा कन्हैय्या मेरा कोई ना साथी न सहेली है

*२२.०७.२०१५ / ३:३४*

# मन

नसलास जरी का तू समोर
मन तुझ्याशी बोलत रहातं
तुझं नसणंच तू असणं आहे
न सांगताही हे मन जाणतं

अनित्य असूनही नित्य मन
नकळत तुझ्या ठायी वसतं
चिरंतनाची कास धरूनिया
तुला ते सर्व चराचरी शोधतं

किती नावांनी मी दिली साद
तरी सर्वात मन तुला पहातं
तुला पहाता पहाता सखया
मन राधा मनच कान्हा होतं

मन आत्मा ह्यांचा स्वामी तू
मन सखी तर कधी दासी होतं
मन पक्षी मन मुक्त मन डोह
मन माझं तुज चरणी वहातं

*२३.०७.२०१५ / १२:३४*

# जब राधा साथ न हो

अबके राधा साथ न होगी
ना चाँद खिलेगा पूनम का
न कान्हा की  बंसी बजेगी

यमुनाजी सिमटके सूखेगी
न मयुर नाचेंगे बरसात में
पायल चूपचूप रह जाएगी

कैसे रचेगा रास कृष्ण संग
नहीं नाचेगी राधा साथ तो
कौन खेलेंगी होरी तुम संग

पछताओगे इम्तहान लेकर
रोओगे तुम गुमसुम तनहा
अकेले वंशीवट तले बैठकर

*૨૩.૦૭.૨૦૧૫ / ૪:૫૧*



# पाऊस मन

पाऊस दरीतला पाऊस डोंगरातला
पाऊस तुझ्या माझ्या चिंब मनातला
नसतोस तू भिजताना माझ्या जवळ
तरी तुझे स्पर्श स्पर्शतात थेंबातून
असो रात्र वा असो दिवस सखया
आहे पावसाचं राज्य माझ्या मनावर
सवंगडी म्हणू तुला की सहचर म्हणू
कोणत्याच डावात नव्हतास माझ्या
कुठल्या ढगांत लपलास छपलास
एकटीनेच खेळले लपंडाव नी झिम्मा
आतबाहेर पाऊस राहिला झिरपत
इंद्रधनूसम येतोस अवखळ अवचित
अधिर अविट असे अस्फुट दर्शन
निमीषात व्यापलंस अनवट अंतर

किती सुंदर आपलं नातं निर्मळ
ऊन पाऊस होऊन बरस तू अविरत
तू आहेस नाहीस कुणास ठाऊक
तरी चित्त व्यापतोस होऊन पाऊस
भक्तीने करतोस ओलेचिंब हृदयास
घन मेघ कृपेचा कर वर्षाव मजवर
तू नित्य अनित्य सगुण वा निर्गुण
सरो हे द्वैत होऊदे अद्वैत विश्वाशी
कोसळ असा की येऊन अंतरी पूर
बनून नदी मी मिसळेन सागराशी..

*२४.०७.२०१५ / ९:५०*

# आषाढी पहाट

लक्ष लक्ष पावलं चालतात तुझी वाट
पहातो त्यांची वाट चंद्रभागेचा तो घाट
व्याकूळ नेत्र प्राण कंठी आले विठूराया
आता होईल भेट म्हणे आषाढी पहाट

ह्याच दिसासाठी केली होती आटाआटी
जाऊ पंढरीसी म्हणुन तुडवली दिवेघाटी
होईल पूरी आस मिटेल सर्व शोष विठ्ठला
जेव्हां दिसे हात कटी अन चंदनाची उटी

नाही केली वारी तरी दिसे तुझी सावली
देई बा दर्शन वा पाठव तुझी चरणधुली
झाले नत जुळले हस्त दे मज प्रेमभक्ती
होवो सगुण मिलन माझे विठाई माऊली

तूच वृन्दावनी तुझाच असे अंतरात वास
व्हावे नाम श्वासासवे असो हा निदीध्यास
तुझ्या रूपी तुझ्या चरणी राहू दे मस्तक
भेट होता जिवा शिवाची संपू दे हा प्रवास

*२७.०७.२०१५ / ८:२०*



# सौगातें

कहा था अजनबी के अंदर मत आना
टूटे घरौंदे पर यूँ तुम दस्तक ना देना
बनके आए थे घने आसमाँ की छाँव
बूँद भी न बरसाकर तुम ऐसे न जाना

बारिश की टिपटिप भी सुन सकती हूँ
सागर के लहरों की बातें भी सुनती हूँ
तुम तो होते हो यूँ चुप गुमसुम से के
बस अपने दिल की धड़कन सुनती हूँ

तुम वैसे ही हो जैसे मुझमें मेरी रूह है
दिखती नहीं पर उसे महसूस करना है
ज्योत जलाऊँ जब मैं अंतरात्मा भीतर
बस तेरा ही दीदार करने की चाहत है

नहीं होती बर्दाश्त जुदाई की ये रातें
जब नहीं हो पाती हैं बरसों तक बातें
तुम्हारे आने की हल्किसी आहट भी
बरसाती हैं मुझपर अनगिनत सौगातें

*२७.०७.२०१५ / १६:००*

# नि:शब्द धून

तुझ्या माझ्या अबोल संवादात
नि:शब्द धून असते सतत सुरू
शांतता होऊ लागते सहज शब्द
शब्द होती ब्रह्म शब्द होती गुरू

निश्चल निरवता बनते सजीव
डोळ्यांत गोष्टी लागतात झरू
ओठ चुप्प श्वासा संगे सजग
मन होई पक्षी नि देह कल्पतरू

प्राण बनती सूर जीव बने वेणू
हळूच फूंकलेस स्वर शांत भरू
वेळू बनात घुमतो नाद अनादी
देह झाला अक्षर मन होई वारू

अंतरात गाज वाजे पैंजण साज
पायी ठेका त्याने नादावले घुंगरू
आपल्या अबोली बोलीने सख्या
आसमंत झाला रे पाखरू पाखरू

*३०.०७.२०१५ / ७.१५*



# काफिला

काफिला चलता रहा शोर यूँही मचता रहा
सरी भीड़ बीच में दिल अकेला ढलता रहा

सूनी यादों के साये मुझे राहों में घिरते रहे
मैं खोयी राह में और कारवाँ बिखरता रहा

चाहा दिलने तेरा साथ हमेशा मिलता रहे
ऐसे छूटा हाथ के सफर तनहा बनता रहा

उम्मीदों का दामन पकडे बेसब्रसे खड़े रहे
तेरा मेरा मिलना एक स्वप्नसा बुनता रहा

अबतक जिस्म के जाने कितने बाज़ार रहे
रूह का लेकिन क्यूँ न कोई खरीददार रहा

दिल में छिपी बातों के कईं ऐसे खजाने रहे
होटों से निकली आहों का मेला चलता रहा

*०६.०८.२०१५ / १६:३५*

# स्पर्श

घरुन ऑफिसला पोहोचेपर्यंत अनेक स्पर्श
बसच्या रांगे पासून ते पार फलाटा पर्यंत
जाणतेपणी वा अजाणतेपणी झालेले तरीही
काही लोचट, काही बोथट तर कधी लाघटही
नकोसे काही  काही बाळांचे कोवळे हवेसे स्पर्श
स्त्रियांच्या डब्यात रागीट अन उदासीन स्पर्श
कधी असह्य ढळत्या अश्रुंचे लज्जित डोळे,
कधी कासावीस अन कलहकारी हातांचे स्पर्श
हपापलेले, अधाशी अस्वस्थ करणारे काही,
उघड्या डोळ्यांनी वस्त्र हरणारे बरेचसे स्पर्श
मोबाइल मध्ये गाडलेले, झोपेनं दाट घेरलेले
आत्म मग्न कोणी कोणी वाचनात गढलेले
फोन वरील गप्पात गूढ गंभीर हरवलेले स्पर्श
रोज वाचते माणसं मी एकटीच उत्सुकतेने
प्रत्येक स्पर्श स्पर्शून जातो अतीव उत्कटतेने
स्त्रीच होते शत्रू अन स्त्रीच घेते सांभाळून
घरचा राग निघतो मग सहप्रवासी सखीवर
प्रत्येकीचं सुख दुःखं भिडतं अगदी खोलवर
चकित होते मी प्रत्येकीत मलाच बघून अन
स्पर्शतात माझी अनंत रूपे मला ओळखून

*१०.०८.२०१५ / ३:२५*

# जिवत्या

खोल खोल हृदयातलं काही लिहावं म्हणते
हृदयातलं हृदयालाच कळेल ते सांगू पाहते

निर्जन बेटावर एकटीच होते रे उभी सख्या
पाहून मला विकल वेदनाही झाल्या मुक्या

काळाचं गणित देखील चुकतं पहा अनेकदा
क्षण होती युगं दिवस बने कालरात्र आपदा

वैरी झाले दूत निरोपाचे घात करी महामाया
डोळे झाले नदी अन जणू वाहती सागरकाया

होत्या सुखांच्या राशी पण तुझ्यावीण रित्या
सुन्या साऱ्या दिशा जणू प्राणावीण जिवत्या

बंद सारी दारं कवाडं आंत प्राणपाखरू पेटलं
देह बसे जागी खिळून मन चहूकडे पिसाटलं

तुझ्याकडे जाणारी राया नव्हती एकही वाट
अंधारले नभ व्याकूळ आले भरू मेघही दाट

किती किती केले यत्न परी ये न तुझी साद
तुझ्या वाचून प्रिया माझा न कुणाशी संवाद

तुला सारी नातीगोती माझे इव इवलेसे जग
माझी इवलीशी आशा कधी माझ्याकडे बघ

केल्या नेत्रांच्या ज्योती तुज अर्पिण्या अनंत
नाम जपले प्रेमभावे सखया चित्त झालं संत

*१९.०८.२०१५ / ४:४०*

# सलोने सपने

तनहा गुजर रही थी जिन्दगी बडे चैनसे
क्यूँ आए हो लेकर झूठे सपने सलोनेसे

था पता जीना है बिना संजोये कोई सपना
क्यूँ दिखाया बिखरते रंगो का ताना बाना

इतनीसी है आस तेरी बाहों में समेटे रोलूँ
तेरा दामन मिले ये बात कैसे तुमसे बोलूँ

देह का त्यजना नहीं ये ये है मेरा समर्पण
काश समझते तुम तुम्हें  ही करना है अर्पण

मेरे सजने संवरने के नहीं रहे कोई मायने
तेरे नैन छूलें इन्हें तोही खुलते हैं मयखाने

बस एक ही तमन्ना रहेगी अंत तक जोगी
होटोंपे तेरा नाम और निगाहों में छब होगी

*२३.०८.९५ / ६:४७*

# चंदन का लेप

मुझे प्रेम करना ना आया कान्हा
अगर आता तो क्या तुम न आते

काटे तुम बिन दिन रैन यूँ तनहा
कैसे बुलाऊँ जोगी तुम नहीं सुनते

अरी सागरलहरों चाहे रहे दूर चंद्र
क्या चाँदनीसे हम प्यास बुझाते

कुछ कमी रह गयी है प्रीत में भद्र
वरना क्या तुम मोहे दरस न देते

तप कर कर जो विकल हुई काया
प्रभू अपनेही चंदन का लेप लगाते

विरह अग्नी में सुलग गयी छाया
क्यूँ नहीं कदंब सम गलेसे लगाते

*२४.०८.२०१५/१२:३५*

# पिसावेडा जीव

उगीच टिपं गाळायची नाहीत
डोळ्यातून पाणी काढायचं नाही

लागतं कधी वेड कुणाचंतरी
जडतो कधी वेडा जीव कुणावर
तरी मनाला आवरून धरायचं
कुणाकडे गहाण टाकायचं नाही
डोळ्यातून पाणी काढायचं नाही

येत राहते आठवण नसलेल्याची
पुसली जाते ओळख स्वतःचीच
असून नसणाऱ्याला का शोधायचं
इतकं उधळून टाकायचं नाही
डोळ्यातून पाणी काढायचं नाही

होतोच जीव पिसावेडा आठवानं
अदृश्य पदर होतो ओला आसवानं
साचलेलं काहूर ह्रदयात साठवायचं
न येणाऱ्याची वाट पहायची नाही
डोळ्यातून पाणी काढायचं नाही

आस असते आश्वासक शब्दांची
फक्त प्रेमाच्या दोनच बोलांची
अव्यक्त कसं बोलून दाखवायचं
मनातलं सारंच सांगायचं नाही
डोळ्यातून पाणी काढायचं नाही

*१०.०९.२०१५ / १४:३५*



# चेहरा

कळणार कसं तुला खोल खोल मनातलं
चेहराच नाही तुला तुला कसं कळवायचं

शोधत बसते मी तुला रेखाटून काही रेषा
चेहराच नाही उमटत कशी कळावी भाषा
नेत्र मात्र डोहासमान आभाळात दिसतात
कसं तुझ्या नजरेतून मनात पोहोचायचं
चेहराच नाही तुला तुला कसं कळवायचं

अनंत काळापासून शब्दांत बांधून पाहिलं
कधी नभात कधी मेघांत आकारून घेतलं
आजानुबाहू तुझे क्षितिजाशी पोहोचतात
त्या बाहूंत शिरून कसं वादळ शमवायचं
चेहराच नाही तुला तुला कसं कळवायचं

शोधलं चारी धामात तर कधी देव्हाऱ्यात
कधी शिरले अनाथाश्रमी कधी बंदिगृहात
तुझे अज्ञात स्पर्श अणुरेणुतही प्रकटतात
अस्पर्श पाऊलखुणांवर आजन्म चालायचं
चेहराच नाही तुला तुला कसं कळवायचं

*१०. ०९. २०१५ / १५:४०*



# कृष्णसखी

जन्मजन्मीच्या विरहाचे दे दे घाव आणखी
तव प्रेमाची आस राहो अगदी मीरे सारखी

कठोर हृदयाची अजून का नाही होत सवय
कुठे आहेस का नाही येत विठू तुझी पालखी

तप्त देह व्याकूळ मन झुलतंय हिंदोळ्यावरी
येईल सखा पडेन पायी होईन कृष्णसखी

कानी येता येता का दूर जातात पाव्याचे बोल
नाहीस तू तर झाले जोडवी पैंजणास पारखी

किती काळ ठेवशील तिष्ठत पंढरीच्या राया
मज भक्तिची सखया आता तूची लाज राखी

प्राण जाऊ लागले माझे लागले नेत्र पैलतटी
पावलं दिसेना स्पर्श स्पर्शेना द्रृष्टी झाली दु:खी

येरे येरे आता पूरे झाले तिष्ठणे घेई हृदयाशी
गळली माळ सरला जप तुझे राहो नाम मुखी

*१४.०९.२०१५ / १:२५*

# अवघा देह काशी

हात गुंफला हातात तुझ्या प्राणात गुंतली दिठी
मी न राहिले माझी सख्या अशी द्रुढावली मिठी

मीच आहे उमा तुझी मीच काली जया हेमवती
राहो सदा स्मरण माझे मला मीच जयजयवंती

उभी राहुनी एका पायावर केले मी तप तुजसाठी
का न आले चंद्रमौली मी वाट पाहते सागरकाठी

वाटतं द्यावा उधळून सारा शृंगार तुज पायाशी
एकरूप होण्या तुजसी झाला अवघा देह काशी

शिव तूच शक्ती तुझी मी विसर न पडो कदापी
पावावे तू रुद्रा म्हणूनी आळविते काव्य आलापी

देई दर्शन हीच प्रार्थना तव चरणाशी आनंदघना
देई मरण करी हरण अहंकार सारा हे चिदानना

*२१.०९.२०१५ / ५.३०*

# तनहा आलम

जब तुम कर देते हो तनहा मुझको
सारा आलम भी तनहा हो जाता है
क्यों तेरे होनेसे साँसे चलती है मेरी
या जीना भी दिखावा बन जाता है

कागज़ कलम भी लगते हैं अन्जान
अल्फ़ाज़ किसी कोने में खो जाते हैं
मुझसे मैं बन जाती हूँ अजनबी सी
शायरी पर अँधेरे घिर घिर आते हैं

नहीं बनना मजबूर तेरे एहसास से
तुम हो ना हो पैमाना पर बहाना है
तुम्ही से सजा रहे आशियाना मेरा
ऐसे आसमाँसे अब निकल जाना है

०६/१०/२०१५ - ८.३५

# शब्दबिल्व

संपले सारे शब्द माझे संपली बिल्वपत्रे आता
तुलाच वाहण्या रे वेचली होती अनादि अनंता

कवितेचे बोल बनले त्रिदल तुजसाठी रे त्रिनेत्रा
प्रसन्न करणे झाले कठीण कृपा करी रे अपात्रा

वाहिली भक्ती पूजीली प्रीत हर शंभो महादेवा
उघडी नेत्र पाहा सर्वत्र कसा हा फुलला बहावा

किती तुझी करावी याचना केली कठोर अर्चना
तिष्ठते आहे तुझ्या द्वारी केवळ तुझीया दर्शना

सोडला अहं सोडले मीपण झाले निःसंग तुझ्यासवे
करेन पूजन भजेन सोहंम वाहेन असिधारा  आसवे..

*६.१०.२०१५ / १०:०७*



# Unending Illusion

Illusion is thy name O unseen mystic,
You hold me mesmerized with magic flute
Sweet coated words float my soul high
And then you sweep me across my feet
To throw down from unscathing heights!
How do I show wounds and bear the pain?
No one will ever believe my unmarked scars
They know not that illusions hurt the most,
Illusion takes away life slowly and gently
Taking away every breath along with tears
Tearing me apart from within uncut unheard
The oncoming death too seems an illusion
Same like life has become an unending illusion..

*11.09.2015 / 12:05*

# तुमही सबकुछ

तुमही से शुरू होकर जिन्दगी तुमही पे रुकती है
चलूँ चाहे किसी दिशा में तुझही पे आकर थमती है

हूँ दूर और चाहे जाऊँ कहीं और दूर साथी तुमसे
मन की चाह मेरी बस तुम ही में जाके बसती है

तुमही से है जिन्दगी और तुमही से अब बसेरा है
उडूँ पंख फैलाए पर उडान तेरे कदमों में समाती है

तुमही से निकलकर सांझ रात बनके ढलती है
चाँदनी बनके रूह मेरी तुमही में आके सिमटती है

तुमही पर्वत तुम सागर तुमही से बारीश बनती है
तुमही से बहके नदिया अग्निसी मुझपे बरसती है

तुमही मौसम तुमही से रोशन सुबह शाम होती है
तुमही गगन के चंद्र सूर्य जिनसे आत्म लौ जलती है

*०१.११.२०१५ / ४:२४*

# निरोपाचे तोरण

निरोपाच्या क्षणांना लावू आनंदाचे तोरण
भेटू सख्या लवकरच असे देऊया आवतण
झाले डोळे ओले तरी इथे तिथे पाहू नकोस
एकएका थेंबात बघ वाहते तुझीच आठवण

दिवाळीचे दिवे आता अंतरातच उजळतात
दारातले रंग माझ्या नजरेतून प्रकाशतात
पाडव्याची ओवाळणी पाठवशील का कधी
नकळत साऱ्यांना भेटी हृदयात पोहोचतात

तुझ्या आठवणीने आज माळला मी मोगरा
वाटे त्याच्या ऐवजी तुझ्यात मिसळू सागरा
कशी जगू तुझ्यावाचून प्राणाहूनी प्राणप्रिया
तुझ्या नावाने उभी मी अखंड विरह जागरा

*१०. ११. २०१५ / १७:००*

# नित्य वनवासी

आभाळाचं तबक घेतलं ओवाळायला
उगवत्या सूर्याचं केलं मी केशरी गंध
चांदण्यांच्या अक्षता भाळी लावायला
चंद्रकोरीची अंगठी करी औक्षण बंध

आली गेली कितीक वर्ष अन् किती सण
फक्त नव्हतास तू अन् तुझी ओवाळणी
झाले आता मोकळी फिटलंय सारं ऋण
आता मनांचा पाडवा अन् जीवांची जोडणी

सजलंय निरांजन लेवून पंचप्राण ज्योती
प्राणसखा राहे अनंतात कोठेतरी दूरदेशी
उभी निरंतर जन्मजन्मांतर घेऊन आरती
तुझ्यावाचून जगणे झाले नित्य वनवासी

नाही कशास अर्थ नकोत चंद्र तारे सूर्य
नको श्रुंगार नको सजणे बाह्य नजराणे
नाही राहिले मज आता लढण्याचेही धैर्य
झाली रात्र काळ तबक झाले बापुडवाणे

*१५.११.२०१५ / ७:२३*

# यह दिल

यह दिल है जो धडकता है
मरहम लगाते लगाते न जाने
यह क्यूँ खुद घायल होता है

यह दिल इन्तजार करता है
राह देखते देखते किसी की
यह खुद नजर बन जाता है

यह दिल बहुत कुछ कहता है
बातें करते करते जाने ना क्यूँ
यह खुद बेजुबाँ हो जाता है

यह दिल रोज सुलगता भी है
जलते जलते पर अग्नी जैसे
आप ही सूरज बन जाता है

यह दिल जो बहकता रहता है
दिल लगाते लगाते मासूम दिल
मुहब्बत ए खुदा कहलाता है..

*१६.११.२०१५/९.२८*

# Lone Horizon

O my dear Ocean, listen to me
Usually you capture my gaze,
But today i saw beyond you
Beyond wilderness of waves
The clear line kept inviting and
The horizon captivated me..
The sky seems to kiss it
But never does even touch
You seem to belong to it
But keep going away from it
My heart went out to it today
Feel like crossing all the length
Covering entire breadth of it,
Taking it into my open arms
Cutting all the bonds of life

Breaking the customs n rituals
Feel like reaching out to you
In all your majesty of sea n sky
You look more powerful n sublime
With Sun n Moon setting in you
You are the only one O horizon,
Who can encompass my thirst
You can take all my turbulence
Let me come to you with this urge
Crossing the barrier of waves
Facing the storms and thunder
Walking through the maze of stars
Rushing to you in my eagerness
Engulf me into your forgiveness
Drink me into your expansive mind
Let the desires n deserts melt
Allow me to merge in you fully
Along with my ever growing wants!

# कमंडल और कफनी

भूलना चाहती हूँ वह दिन वह तारीख
जब चले गए थे तुम छोडकर साथ
ऐसा भी नहीं के याद आते हो हर पल
ना मैं महसूस करती हूँ हाथों में हाथ

जिन्दगी के संग संग बढ चली हूँ आगे
न रोयी न रूकी कहती रही उनकी बानी
क्यूँ भूलता नहीं पर यह दिन और समय
जबकी सदा रहती थामें कमंडल कफनी

ऐ मौत तेरा खौफ नहीं है ना है तकरार
तेरा तो यह तरीका है युगांतक से चला
रहते हो दबे दबे आसपास ही कहीं पर
पता भी नहीं चलता तेरे आनेका भला

कितना अजीब है तेरा अस्तित्व देवता
तुझे चाहूँ के न चाहूँ है ऐसी कश्मकश
तुझे नकारना चाहें भी तो नहीं हो पाता
कोशिश करें जितनी भूलने की बेशक

*०४.०१.२०१५ / १८:२८*

# अक्स

मेरी खामोशियों की भी अलग जुबान है
महसूस तो करो ये करती क्या बयान है
जो न कह सकता है मेरा दिल लफ्जों से
उन अनकहे फसानों का हल्का सामान है

रात की बाहों में लिपटा चुप आसमान है
चाँदनी के घर पर जैसे चाँद मेहमान है
जहाँ पर रहना नहीं नसीब इस जनम में
बता मेरे परवरदिगार कहाँ मेरा मकान है

शीशे में देखूँ तो मेरा ही अक्स अन्जान है
तेरे बिन मेरा जिस्म जैसे तनहा बेजान है
जिन्दगी के सफर में ना भी हो साथ तेरा
तेरा प्रेम कर देता मेरी हर राह आसान है

छिपा रक्खी सबसे इक गहरी मुस्कान है
अनकहा यह राज जानते सिर्फ भगवान है
इन्सानों की नगरी में तूही एक फरिश्ता है
तुझे देखकर मुझे होती रब की पहचान है

*०६.०२.२०१६/१०.०० रा*

# तू

तू ऊन तू पाऊस
मला तुझ्यात
भिजण्याची हौस

तू नेत्र तू गात्र
नित्य गुणगुणते
तुझेच स्तोत्र

तूच सुरवात व अंत
हृदय व्यापलेला
तूच आसमंत

तू क्षितीज तू सागर
ओंजळीत न मावणारे
सुखाचे आगर

तू बकूळ तू केशर
देहभर उधाणलेला
प्राजक्त मोहर

तू मी अन् मी तू
तप्त आषाढ अग्नीत
जणू चांदण ऋतू

*०३.०३.२०१६/९.३५*

# इंद्रधनू

उरलायस अवघं
चित्ताकाश व्यापून
येरे येरे अंतरी
दिव्यत्वाचे पंख लेऊन

क्षितीज विसावलंय सागरात
अग्निचे रंग भरून
येरे येरे माझ्या उदरी
रूज इंद्रधनू होऊन

निष्पर्ण तरूचे सौंदर्य माझे
मावळत्या सूर्यासम देखणे
येरे येरे धरेवरी
बरस तव चंद्र चांदणे

जन्म माळला भाळी
झाले सावळ्याची सावली
येरे येरे मुरारी
कनुप्रिया आसावली

# तपस्विनी

कान्हाची साद येतच राहते कानी
कधी यमुनापार तर कधी काननी
आधी येतं मोरपीस मग वाजे पावा
अळता राहे ओला नुपूर धावे रानी

तोच वसे हृदयी तोच ध्यानीमनी
तोच श्वासात प्राणात निशिदिनी
त्याच्यावाचून राधा न राधा राहे
कान्हाच दिसे जेव्हाही पाहे दर्पणी

तोच नित्य विरागी विहरतो वनी
ती त्याची जणू विरक्त विरहिणी
गोकुळ त्यजून जाता तो निर्मोही
क्षणात जाहली निःसंग तपस्विनी

*२१-०३-२०१६*



# यात्रा

यात्रा निरंतर चलती रहेगी
साथ तेरा हो न हो
झुक जाऊँ जिस दिशा वह
तेरी बने तू हो न हो

कटे जनम तेरे आशिश बिना
हाथ सिरपे हो न हो
नत हो माथा युगसे युगतक
तेरा प्रेम मेरा हो न हो

न देखा तुझे पर चाहा बेहद
तेरे दरस हो न हो
तेरी दृष्टी तेरा स्पर्श पा सकूँ
मैं अहल्या हो न हो

मेरे शब्दोंसे बाँधू पूजा स्वामी
भाव मुझमें हो न हो
तुम गुरू तुमही सखा जन्मोंके
कृपाघन वर्षा हो न हो

मैं हीन मैं दीन दासी चरणों की
पवित्र देह हो न हो
मिटा पाप धुला मैल तेरे मंदीर में
मोक्ष मेरा हो न हो

*२१.१२.२०१५/१६.५८*

# 'कापूर' - प्रतिक्रिया

प्रिय श्रद्धा,

'कापूर' खूपच भावले.

पुस्तकाची विशेषता म्हणजे इतर पुस्तकाप्रमाणे याचा ढाचा नाही. 'गुरुसखा' म्हणजे तुझे-आमचे प्रिय स्वामीजी, यांनीच हे अप्रत्यक्षरीत्या 'प्रकाशित' केले. 'प्रकाशित' होण्यासाठी यातील कविता जणू उतावीळ झाल्या होत्या! 'गुरुसखा'ने ते इतके मनावर घेतले की महिन्या दीड महिन्याच्या अवधीत सर्व हातांनी त्यांना पेलले व आखीव रेखीव व अत्यंत सुगंधयुक्त 'कापूर' जगापुढे आला.

कापूर उघडा ठेवला तर तो हवे विरतो (उडून जातो). त्यामुळे मी त्याला मनातच जपून ठेवला आहे.

कापूर पेटवला तर प्रकाश देतो, पण स्वतःचे 'अस्तित्वच' संपवितो म्हणून प्रकाशाचा हव्यास न करता त्याला मनाच्या कुपीत बंद ठेवला आहे. आणि हीच इच्छा 'गुरुसखा'ची असणार!

कापराची डबी उघडली की त्याचा एक आत्मिक वास मनाला प्रसन्न करतो. तसेच निसर्गात अतिउंचावर गेल्यावर श्वास घेणे अवघड होते, तेव्हा कापूर हुंगला की श्वासोच्छ्वास करायला मदत होते. अगदी हे वरील हेतू तुझ्या 'कापूर'ने सहज सिद्ध होतात.

यातील काही कवितांच्या खाली तू दिनांक लिहिले आहेस, त्यावरून भविष्यात घडणाऱ्या गोष्टींचा आनंद- उदासीनता तुझ्या मनात भरून गेल्यामुळे त्या तुझ्या कवितेतून बाहेर पडल्या. वाल्मीकीचे 'रामायण' रामजन्मापूर्वीच लिहिले गेले ना! कवी हा शापित 'देवदूत' असतो. हेच तुझ्या लिखाणाने सिद्ध केले.

कवी हा काही गोष्टींचे अनुभव...घेत असतो, तसेच तुझ्या या कवितेचे आहे.

'जूता', 'डाकिया', 'ठेस' या कविता तर प्रत्येकाच्या मनांत असतातच. पण प्रकटीकरण तुझे असल्याने उत्कट झाल्या आहेत.

आता सर्व कवितांची यादी नाही देत. काही थोड्या कविता मोर पिसारख्या! पीस गालावर फिरविल्यावर होणाऱ्या सुखद संवेदना! पण अधिकतर कविता मनाचा डोह तळापासून ढवळणाऱ्या! दगड, गोटे, माणिक वर आणून खाली नेणाऱ्या! काही हृदयस्पर्शी काही भावस्पर्शी, काही मोजक्या बुद्धिस्पर्शीसुद्धा!

मुक्तछंदात लिहूनसुद्धा तुझ्या या कवितांना गेयता लाभली आहे. त्यामुळे वाचतानासुद्धा त्या तशाच वाचल्या जातात. कवितेतील शब्द मात्र ज्ञानेश्वरीत म्हटल्याप्रमाणे 'भाव आधी शब्द नंतर' असेच आलेले आहेत. त्यामुळे शब्दांची तडजोड कोठेच नाही! सहज पाणी ओघळत जावे तसे!

वाचताना भाषा, मराठी, हिंदी, इंग्रजी असली तरी भावनांचा झोत कुठे तुटल्यासारखा वाटत नाही. या वेगवेगळ्या भाषेतून लिहिताना त्यात भाषेचा गोडवा, त्या भाषांची विशेषतः भाव तरलता फारच सुरेख जपली आहेस. अशी जादू तुझी तैलबुद्धीच करू जाणे!

आता तर कुठे ही 'चुणूक' आहे. त्याची विशालता, भव्यता, संपन्नता 'गुरुसखा'च्या कृपेने आम्हा सर्वांना लवकरात लवकर अनुभवण्यास मिळो ही प्रभूचरणी विनम्र प्रार्थना!

तुझी मावशी
सुनीता प्रभाकर
गुरुवार, २७ जून २०१३
(श्रीमती सुनीता प्रभाकर देशपांडे,
माजी मुख्याध्यापिका, सरस्वती विद्या मंदिर, पुणे)

प्रिय गुरुसखी श्रद्धाताईस,

वर्षाचा सा.न.

आज अनेक वर्षांनी (जवळजवळ २०) तुला पत्र लिहिण्याचा योग आला (आणला) आहे. तुझ्या 'कापूर'ने हा योग आणला आहे. आज लिहू, उद्या लिहू असं करत करत शेवटी आता लिहायला बसले.

खरंतर यापूर्वी मी कविता वाचल्या आहेत. पण या तू लिहिलेल्या कविता असल्यामुळे याचं महत्त्व जास्त आहे, म्हणूनच तब्बल तीन वेळा मी पुस्तक वाचलं. मी सर्वसामान्य वाचकांसारखं ते वाचलेलं नाही. कारण तुला काय म्हणायचंय ते कविता वाचून मला समजतंय. त्या त्या वेळी तुझ्या मनाची अवस्था कशी असेल हे मी एक स्त्री म्हणून समजू शकते. पण तुझ्या सहवासात असल्यामुळे ते मी जाणू शकते. त्यामुळेच सर्व कविता मनाला भिडणाऱ्या आहे नक्की. तरीही त्यातूनही मला भावल्या अशा काही कविता आहे, ज्या माझ्या आयुष्याशी मला समर्पक वाटतात. तुझ्या कविता आणि माझं आयुष्य यांचा गोङ्क घालून मी एक कविता लिहिली आहे. ती वाचून तुला माझ्या भावना समजू शकतील. त्यामुळे आता इतर जास्त लिहीत नाही. माझं पत्र मिळाल्यावर ङ्खोन करशीलच.

तुझीच,

वर्षू

१९-७-२०१३

(सौ. वर्षा पाठकजी अत्रे)

............••••••••............

प्रिय श्रद्धा,

स्नेहपूर्वक आठवण.

तुझा कवितासंग्रह 'कापूर' दि. १७ ऑगस्टला ज्ञान प्रबोधिनीत गेले होते तेव्हा मिळाला. मराठी, हिंदी, इंग्रजी तिन्ही भाषांतून तितक्याच मोकळेपणाने व्यक्त होणारी श्रद्धा आधी माहीत होती त्यापेक्षा जास्त समजली आणि आवडली.

'प्यासी आत्मा की उदासी' खूप खोलवर जाणवून गेली. जीवनात न आलेली छकुलीही. Our sweetest songs are those which are filled with saddest thought.. हे खरंच आहे.

पण यातून उभारी घेऊन तुझ्या व्यक्तिमत्वात, वक्तृत्वात आणि लेखणीत जो प्रसाद आला, त्याचंही दर्शन या संग्रहात काही कमी नाही. स्वामीजींशी जोडलेलं नातं 'गुरुसखा' अतिशय हृद्य वाटलं. कन्याकुमारीच्या सागराशी केलेला संवादही तसाच. संवेदनशील मन घेऊन आलेल्यांना या व्यवहारी जगात खूप सोसावं लागतं. पण बा. भ. बोरकर म्हणतात -

सोस तू माझ्या जिवा रे

सोसल्याचा सूर होतो -

श्रद्धाने जे सोसलं त्याचे हृदयाला वेध घेणारे सूर झाले, ते 'कापुरा'त दरवळले. माझ्या मनाला स्पर्श करून गेले - दुखवून नि प्रसन्न करूनही.

कितीही अंतरावर असले तरी श्रद्धाची नित्यसखी.

- लता

(वा. स्वर्णलता भिशीकर,

ज्येष्ठ कार्यवाह,

ज्ञानप्रबोधिनी, सोलापूर)

प्रिय श्रद्धा,

तुझ्या 'कापूर' या कविता संग्रहाबद्दल त्रिवार अभिनंदन. पुस्तक उघडले व प्रस्तावना वाचली. ती वाचूनच मन थोडे सुन्न झाले. साधारणपणे कविता काय असतील याची कल्पना आली. सर्व कविता हळूहळू वाचल्या. सगळ्याच कविता मनाला भिडणाऱ्या वाटल्या. वरून कणखर दिसणारी श्रद्धा अतिशय हळवी आहे. याचा प्रत्यय आला. सर्व कविता चांगल्याच आहेत. याबद्दल शंकाच नाही.फक्त प्रत्येक कवितेत थोडी निराशाच दिसली. तुझ्या जीवनात अनेक संकटे आली, त्यांना तू निर्भीडपणे सामोरी गेलीस व स्वतःची वाट शोधलीस, ती तुला सापडलीही. खरंच वेळोवेळी तुला आईने दिलेल्या धैर्यामुळे हे शक्य झाले.

श्रद्धा, तुझ्या मनातली निराशा आता काढून टाक. कारण तू तुझा योग्य मार्ग निवडला आहेस. कदाचित तुझ्या हातून काही मोठे कार्य व्हावे म्हणूनच दैवाची ही योजना असेल. तूच तुझ्या प्राक्तन कवितेत लिहिले आहेस ..

प्रत्येकाचे प्राक्तन असते
अन् नशिबाचा भोग असतो
काही म्हटलं तरी या देवाचाच दोष नसतो

तुझे आता जे भोग होते. ते संपले असे समजून तू हातात घेतलेले काम निष्ठेने करत राहा व करत राहशील याची खात्री आहे.

मला जे वाटलं ते लिहिलं आहे. तुला यात काही गैर वाटत असेल, तरे सोडून दे. लिहिण्यात काही चूक झाली असेल, तर माफ कर.

तुझ्या पुढील प्रवासाला मनःपूर्वक शुभेच्छा.

तुझीच हितचिंतक मावशी
वैशाली मराठे
(निवृत्त शिक्षिका, म.न.पा.,
मुंबई)

प्रिय श्रद्धा..
मुंबईहून आल्याआल्याच कापूर मधल्या कविता वाचल्या.... परतही वाचल्या. तू ज्या दु:खाला सामोरी गेलीस ते दु:ख तुझ्या प्रत्येक शब्दाशब्दांतून प्रकर्षाने जाणवतं.

बरसे जब दुख की आँधी
तडपाए जब भी धूप कडी
उसका दीदार बनाए रखना !
मुझे गुलमोहर बनाए रखना !!

व्वा!! या एका कडव्यात तू एव्हढ्या त्रासातूनही कशी काय तावून सुलाखून आपल्या ज्ञानाच्या तेजाने तळपते आहेस ते समजते. असं म्हणतात सुख वाटून घेतल्याने वाढतं आणि दु:ख वाटून घेतल्याने कमी होतं या कवितांमधून व्यक्त झाल्याने तुझं दु:ख खूपच कमी झालं असेल. यापुढील आयुष्यात तुझा गुरूसखा तुला खूप आनंदात आणि समाधानातच ठेवेल अशी मला खात्री आहे. अजून काय लिहू ? कवितांनी आणि तुझ्या मनोगताने भावविभोर केलं..

तुझी मैत्रीण..
अंजली.
(डॉ. अंजली अनंत जोशी, M.D. [Medicine]
लातूर)

१८-०२-२०१६



## श्रद्धा पाटील-व्यास

शिक्षण - एम. ए. (इतिहास)
विवेकानंद केंद्र, कन्याकुमारी येथे दहा वर्ष पूर्णवेळ कार्य. त्यातील चार वर्ष अरुणाचल प्रदेशात, तर सहा वर्ष पुण्यात कार्य.
अमरावती येथे 'दीपा एज्युकेशन सोसायटी' आणि नागपूरमधील 'सांदिपनी ' शाळेत तीन वर्ष अध्यापन.
योगोपचार तज्ज्ञ म्हणून २५ वर्ष अनुभव. मुंबईत 'टीसीएस' च्या अनेक शाखांत २ वर्ष योगोपचार तणाव मुक्ती वर्गांचे आयोजन.
'शर्यान्स रिसोर्सेस लिमिटेड ' कंपनीत ६ वर्षे 'सीएसआर' प्रमुख पदावर.
मुंबईतील 'भगवान महावीर विकलांग सहायता समिती'त मुख्य कार्यकारी अधिकारी 'इव्ह' या संस्थेत विश्वस्त पदावर कार्यरत.
सध्या 'क्रेस्ट व्हेंचर्स लि.' या कंपनीत 'सीएसआर' प्रमुख पदावर.
स्वामी विवेकानंद यांच्या अभ्यासक मेरी लुई बर्क यांनी लिहिलेल्या 'न्यू डिस्कवरीज' या ६ खंडांवर ५ वर्षे श्री सारदा मठात व्याख्यानमाला.
स्वामी विवेकानंद यांच्या दीडशेव्या जयंतीनिमित्त वर्षभरात १५० व्याख्यानांचा संकल्प २४ डिसेंबर २०१२ रोजी पूर्ण केला.
लहानपणापासून काव्याची आवड; मात्र आतापर्यंत सर्व लेखन स्वांतसुखाय होतं.

'कापूर' हा पहिलाच काव्य संग्रह गेल्या वर्षी प्रकाशित झाला.

